**बाष्पक, मितोपयोजके व त्यांचे सुटे भाग निर्मात्यांसाठी बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टम (BMMS) <u>सार्वजनिक-खाजगी भागेदारी तत्वावर</u> (PPP Model )विकसित करून त्याचे प्रचालन, देखभाल करणे व इत्यादी कामे करण्याकरीता मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांक: बाष्पके -०९२४/प्र.क्र.१५३/काम.-१**
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २५ मार्च, २०२५.

**पहा:-** १) शासन ज्ञापन क्र.बाष्पके -०९२४/प्र.क्र.१५३/काम.-१, दि.९/१०/२०२४.
२) संचालक,बाष्पके संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्र.एसबी.४/लेखाशाखा/२०२५/३२६४, दि.२०/०२/२०२५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य हे देशातीलच नव्हे तर आशिया खंडातील सर्वात मोठे बाष्पक (बॉयलर) निर्मिती करणारे राज्य असून महाराष्ट्रात जवळपास १००० बाष्पकांची निर्मिती होते ज्यामध्ये बरेच बाष्पके निर्यात केली जातात. भारतातील बाष्पकांशी निगडित उद्योगांमध्ये शासनाने घेतलेल्या व्यवसायसुलभतेच्या विविध निर्णयांमुळे झपाट्याने वाढ होत आहे. त्याचप्रमाणे महाराष्ट्रात विविध उद्योगांमध्ये जवळपास ५१०० बाष्पके कार्यरत आहेत.

शासनाने संदर्भीय क्र.१ येथील दि.९/१०/२०२४ रोजी दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार, तसेच Ease of doing Business अंतर्गत व केंद्र शासनाच्या डीजीटायझेशन धोरणांतर्गत बाष्पके संचालनालयाने बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टमचा (BMMS) भाग म्हणून ऑनलाइन आरेखन (ड्रॉईंग) मान्यता प्रणाली आणि डेटाबेस व्यवस्थापनासाठी अत्याधुनिक ऑनलाइन सॉफ्टवेअर विकसित करण्याचा निर्णय घेतला असून, सदर सॉफ्टवेअर Boiler Manufacturing Management System (BMMS) या नावानेच कार्यान्वित करण्यात आले.

सद्यस्थितीत ही प्रणाली ऑनलाईन ड्रॉइंग (आरेखन) मान्यतेसाठी कार्यरत आहे. परंतु, याचा विस्तार करून दूसरा टप्पा म्हणजे संपूर्ण प्रक्रिया जसे की, आरेखन मंजुरी, मटेरियल आयडेंटिफिकेशन, स्टेज निरीक्षण आणि भारतीय बाष्पके विनियम-१९५० (IBR-१९५०) नुसार प्रमाणपत्र जारी करण्यापर्यंत सक्षम करण्याचा या विभागाचा मानस आहे.

महाराष्ट्र राज्यात नामांकित बाष्पके, मितोपयोजके व त्यांच्या सुट्या भागाचे निर्मात्यांकडून बाष्पक, मितोपयोजके व त्यांच्या सुट्या भागाची निर्मितीदरम्यान तपासणीची प्रक्रिया संगणीकृत करण्याबाबत सहकार्य करण्याची इच्छुकता दर्शविली होती. त्यानुषंगाने बाष्पके संचालनालयाच्या

कार्यप्रणालीस अधिक कार्यक्षम व पारदर्शक बनवण्यासाठी सार्वजनिक-खाजगी भागेदारी तत्वावर (PPP Model ) *Boiler Manufacturing Management System (BMMS)* प्रणालीचा विस्तार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

बाष्पक, मितोपयोजके व त्यांचे सुटे भाग निर्मात्यांसाठी **"बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टम (BMMS)"** सार्वजनिक-खाजगी भागेदारी तत्वावर (PPP Model ) मे.कॉसकॉम सिस्टीम्स, म्हसरुळ, नाशिक यांच्या मार्फत विकसित करून त्याचे प्रचालन, देखभाल करणे व इत्यादी कामे करण्याकरीता शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. "बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टम (BMMS)" प्रणालीचा उद्देश:-

१) बाष्पक निर्मिती व व्यवस्थापन प्रक्रियेस डिजिटल स्वरूपात आणणे.
२) सुरक्षितता व कार्यक्षमतेसाठी प्रगत तंत्रज्ञानाचा उपयोग करणे.
३) पारदर्शकता व जबाबदारीसह नियमन सुलभ करणे.
४) बनावट प्रमाणपत्रांच्या वापरावर आळा घालणे.
५) बाष्पके निर्मिती संबंधीत सेवा या ऑनलाइन करून सेवा हमी कायद्यांतर्गत अधिसूचित करणे.
**६)** Ease of Doing Business नुसार बाष्पके, मितोपयोजके व त्यांच्या सुट्या भागाच्या निर्मात्याना वेगवान, पारदर्शक सेवा पुरविणे.

३. "बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टम (BMMS)" प्रणालीचे स्वरूप खालीलप्रमाणे राहील:-

१) बाष्पक, मितोपयोजके व त्यांच्या सुट्या भागाची निर्मिती व प्रमाणपत्रे निर्गमित करणे.
२) बाष्पक निर्मितीदरम्यान तपासणीसाठी डिजिटल मॉड्यूल विकसित करणे.
३) डेटा विश्लेषण व अहवाल व्यवस्थापन.
४) ऑनलाइन ट्रॅकिंग व मंजुरी प्रणाली.
५) सुरक्षितता आणि बाष्पके संबंधीत विविध कायदे, विनियम यांचे अनुपालन
६) Inspection During Manufacturing Process
७) Issue of Makers Certificates
८) Inspection and Certification of Valves / Mountings / Fittings
९) Approval of Radiography
१०) Approval of Heat Treatment Charts
११) Acceptance of Raw Material Test Certificates
१२) Approval of Lab Reports

४. सदरहू "बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टम (BMMS)" प्रणाली सार्वजनिक-खाजगी भागेदारी तत्वावर (PPP Model ) खालील प्रमाणे विकसित केली जाईल.

१) प्रकल्पाची एकूण किंमत:-रू.१,५२,१६,१००/-
२) खाजगी गुंतवणूक :- विविध बाष्पके, मितोपयोजके व त्यांच्या सुट्या भागाचे निर्मिती करणारे कारखानदार यांचेकडून अर्थिक सहाय्य स्वरूपात खाजगी गुंतवणूक रक्कम रू.१,४२,२९,६२०/-

३) महाराष्ट्र शासनाची गुंतवणूक:- संदर्भाधीन शासन ज्ञापन क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली रक्कम रू.९,८६,४८०/-

४) सदरहू "बॉयलर मॅन्युफॅक्चरिंग मॅनेजमेंट सिस्टम (BMMS)" प्रणालीचे (सॉफ्टवेअरचे ) सर्व हक्क शासनाकडे राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१७२६५७७४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BABASAHEB SITARAM SHINDE

Digitally signed by BABASAHEB SITARAM SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC0323A0A674CB4C457CBB6B2C0F8B750E0EE28B3CABD66F127CF1EF467412AE, cn=BABASAHEB SITARAM SHINDE
Date: 2025.03.25 17:28:04 +05'30'

**( बाबासाहेब सि. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
५) संचालक,बाष्पके संचालनालय ,मुंबई.
६) उप सचिव/अवर सचिव (कामगार-१) उद्योग, ऊर्जा कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
७) निवड नस्ती (काम.१)